**मुंबई सीसीटीव्ही टप्पा-२ या प्रकल्पांतर्गत**
**कामांसाठी निधी वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. सीसीटी-३६१९/प्र.क्र.७६/पोल-३.**
दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन-४०००३२.
दिनांक : १८.०७.२०२४.

**वाचा**-१) महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कं. यांचे दरम्यान दि.७.२.२०१५ रोजी झालेला करार
२) शासन आदेश क्र.सीसीटी-३६१९/प्र.क्र.७६/पोल-३, दि.७.२.२०१५.
३) शासन निर्णय क्र.सीसीटी ३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.२६.२.२०१९.
४) महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कं. यांचे दरम्यान दि.१९.६.२०१९ रोजी झालेला करार पूरकपत्र (Contract Addendum).
५) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.२६/२/२०१९.
६) शासन निर्णय क्र. सीसीटी-३६१९/प्र.क्र.७६/पोल-३, दि.३१.३.२०२४.
७) मा. अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाची आढावा बैठक दि.२.५.२०२४ व दि.२९.५.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्ते
८) प्रकल्प सल्लागार यांचा ई-मेल संदेश, दिनांक ७.६.२०२४.
९) मे. लार्सन अँड टुब्रो कंपनीचे दि.७.६.२०२४ रोजीचे पत्र.
१०) मे. पोलीस उप आयुक्त (अभियान), मुंबई यांचे दि.१४.६.२०२४. दि.८.७.२०२४
११) शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३,दि.१.४.२०२४.

**प्रस्तावना.**

मुंबई शहरावर दिनांक २६.११.२००८ रोजी झालेल्या दहशतवादी हल्ला व दादर, ऑपेरा हाऊस, झवेरी बाजार या ठिकाणी झालेल्या अतिरेकी हल्ल्यानंतर सुरक्षिततेच्या दृष्टीने मुंबई शहर व राज्यातील इतर शहरात सीसीटीव्ही प्रकल्प राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या दिनांक २१.०८.२०१८ पत्रान्वये मुंबई शहरात अधिक सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याबाबत विनंती केली. त्यानुसार अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्च शक्ती प्रदत्त समितीने दिनांक ०५.११.२०१८ च्या बैठकीत मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाच्या करारातील " श्येड्युल" मधील तरतुदीनुसार मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा भाग म्हणून अतिरिक्त सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. या बैठकीत प्रकल्पाच्या तांत्रिक बाजु तसेच तपासून अहवाल सादर करण्यासाठी उच्च शक्ती प्रदत्त समितीने पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन केली होती. उक्त समितीने सादर केलेला अहवाल विचारात घेऊन उच्च शक्ती प्रदत्त समितीने दिनांक २४.१२.२०१८ रोजीच्या बैठकीत मुंबई शहरात एकूण ५,६२५ सीसीटीव्ही कॅमेरे मुंबई सीसीटीव्ही प्रकल्प राबवत असलेल्या एल. ॲण्ड टी. कंपनीमार्फत बसविण्याबाबतचा निर्णय घेतला आहे व यासाठी येणाऱ्या रु.३२३.२३ कोटी इतक्या खर्चासदेखील मान्यता दिली आहे. ही वस्तुस्थिती विचारात घेता मुंबई सीसीटीव्ही संनिरीक्षण प्रकल्पातंर्गत ५,६२५ सीसीटीव्ही कॅमेरे मुंबई सीसीटीव्ही प्रकल्प राबवत असलेल्या एल. ॲण्ड टी. कंपनीमार्फत बसविण्याबाबतचा निर्णय घेतला आहे व दिनांक २६.०२.२०१९

च्या शासन निर्णयाव्दारे मुंबई सीसीटीव्ही संनिरीक्षण प्रकल्पाच्या रु. १३०३.५६ कोटी इतक्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. त्यानंतर, सीसीटीव्ही प्रकल्पाच्या अंमलबजावणीबाबत महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी यांचे दरम्यान दि.१९.६.२०१९ रोजी करार पूरकपत्र (Contract Addendum) करण्यात आले. तसेच, CAPEX रकमेच्या १० टक्के "Mobilization Advance" म्हणजे रु.१६,१६,०६,३६७/- इतकी रक्कम मे. एल अँड टी यांना देण्यात आली आहे.

प्रकल्प सल्लागार पीडब्ल्युसी यांनी टप्पा-२ प्रकल्पाबाबत यापूर्वी सादर केलेल्या अहवालावर ५० टक्के कॅमेरे (२९६८ कॅमेरे) व १०० टक्के "Backend Infrastructure" हा टप्पा पूर्ण झाल्यावर CAPEX रकमेच्या ४० टक्के रक्कम म्हणजे रु.६४,६४,२५,४६९/- (वस्तु व सेवा करासह) करारानुसार मे.एल.अँड टी.यांना देय आहे. त्याअनुसार रु.६४,६४,२५,४६९/- (वस्तु व सेवा करासह) इतकी रक्कम गृह विभागाच्या दि.३१.३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये अदा करणेत आली.

तथापि, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाच्या पत्र जा.क्र.१६९/पोआ/कक्ष-१४/अर्थसं/व्हीपीजी/२०२४ दि.१७.५.२०२४ रोजीच्या पत्रान्वये त्यांचे मंजूरी आदेश क्र.१० अन्वये रु.६४,६४,२५,४६९/-एवढ्या रकमेचे देयक तयार करुन सदर देयक पारीत होण्याकरिता अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई या कार्यालयास सादर केले असता सदर देयक कार्यालयाकडून आक्षेपांसह परत करण्यात आले. यास्तव दि.३१.३.२०२४ अखेर सदर निधी खर्च होऊ शकला नाही, त्यामुळे वित्तीय वर्ष २०२३-२४ चा हा निधी समर्पित करण्यात आला असे कळविण्यात आले आहे. यामुळे सदर शासन निर्णय अधिक्रमित करुन सन २०२४-२५ वित्तीय वर्षात नव्याने शासन निर्णय निर्गमित करणे क्रमप्राप्त आहे. आता मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचे प्रकल्प संचालक मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनीने दि.७.६.२०२४ रोजीचे पत्रान्वये, Submission of Milestone २ Invoice-Mumbai City Surveillance Project Phase-II चे रु.६२,०५,६८,४५०/- (जीएसटीसह) एवढ्या रकमेचे देयक सादर केले असुन ते अदा करण्याची विंनती केली आहे. सदर रकमेमध्ये त्यांनी राज्य, केंद्र वस्तु व सेवा कर समाविष्ठ करुन देयके सादर केली आहेत. तसेच सदर रक्कम RFP मधील करारानुसार देणे क्रमप्राप्त आहे. दि.२.५.२०२४ रोजी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबत आढावा बैठक संपन्न झाली तद्नंतर दि.२७.५.२०२४ रोजीच्या मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबतच्या आढावा बैठकीत

"The Chairperson directed MSI to prioritize the completion of all pending tasks & activate an additional 2164 cameras with a clear Field of View (FoV) alongside the existing 2882 cameras by 30$^{th}$ June 2024 which doesn't have dependency on trenching work.

As the project faces a~2% shortfall to satisfy the condition of Go-Live for Part-I of the Augmentation Phase, the Chairperson directed to declare the partial Go-Live of Part I of the Augmentation phase.

**The Chairperson noted the rationale of the payment calculation presented by PMC and directed to submit the Partial Go-Live report and payment note to the department inline with the same.**

The Chairperson also directed to the user to conduct an independent assessment of the cameras with a clear Field of View (FoV) and discuss their findings with the concerned officials of the user department.” असा निर्णय घेण्यात आला.

मे. पीडब्ल्युसी सल्लागार यांनी त्यांच्या ई-मेल मध्ये मुद्दा क्र.८.येथे कळविले आहे की, As per the Minutes of Meeting of the review meeting dated 29th May 2024 -"The project faces a ~2% shortfall to satisfy the condition of Go-Live for Part -I of the Augmentation Phase, the chairperson decided to declare the partial Go-Live of Part I of the Augmentation phase. The chairperson noted the rationale of the payment calculation presented by PMC and directed to submit the Partial Go-Live report and payment note to the department in line with the same.

पीडब्ल्युसी कंपनीच्या उपरोक्त अहवालानुसार सदर प्रकल्पाच्या Submission of Milestone 2 Invoice-Mumbai City Surveillance Project Phase-II चे **रु.६२,०५,६८,४५०/- (जीएसटीसह) (अक्षरी रुपये बासष्ठ कोटी पाच लाख अडुसष्ठ हजार चारशे पन्नास फक्त)** एवढी रक्कम देय ठरत आहे.

मुंबई सीसीटीव्ही फेज-२ पीडब्ल्युसीचा अहवाल Status Report नुसार अनुज्ञेय रक्कमेची खालीलप्रमाणे शिफारस करण्यात आली आहे.

| **Particulars** | **Reference** | **Project Cost in line with Signed Contract dated 19th June 2019 ( Including GST) - INR** |
|---|---|---|
| Total Project Cost | A | 3,23,21,27,344 |
| 50% Caped CAPEX | B = (A/2) | 1,61,60,63,672 |
| 50% Caped OPEX | C = (A/2) | 1,61,60,63,672 |
| Mobilization advance -10% of CAPEX (**Paid to L& T on 25th June 2019)** | **D= B * 10%** | 16,16,06,367 |
| 40% CAPEX against th Go-Live of Phase I <u>Components under Phase I</u> -<br>1. 50 of Cameras commissioned on proposed new locations<br>2. 100% commissioning of the Backend Infrastructure and technical enhancement | **E = B* 40%** | 64,64,25,469 |
| Current Work Completion as of 28th May 2024 and as per decision in the meeting dated 29th May 2024. Clear Field of View ( FoV ) – 2882/5935 cameras which is ~48% completion out of the agreed 50% of the Cameras commissioned. | **F =E* (~48/50*100%)** | 62,05,68,450 |

Note: The detailed findings on the number of live cameras are mentioned in our draft assessment report dt.5.6.2024.

वरीलप्रमाणे विषद केलेल्या बाबी विचारात घेऊन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय.</u>**

मुंबई सीसीटीव्ही टप्पा-२ या प्रकल्पांतर्गत कामांसाठी Submission of Milestone 2 Invoice-Mumbai City Surveillance Project Phase-II **रु.६२,०५,६८,४५०/- (जीएसटीसह) (अक्षरी रुपये बासष्ठ कोटी पाच लाख अडुसष्ठ हजार चारशे पन्नास फक्त)** (वस्तु व सेवा करासह) इतकी रक्कम गृह विभाग-मागणी क्र. बी-१०, ४०५५ पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री या लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्षात (सन २०२४-२५) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांना वितरित करण्यास याद्वारे मंजुरी देण्यात येत आहे. तसेच याबाबतचा संदर्भ क्र.६ येथील नमूद दि.३१.३.२०२४ रोजीचा शासन निर्णय याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

सदर रक्कमेची देयके कंपनीला अदा करतांना आयकर व इतर प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी. सदर रकमेत जीएसटी कराचा समावेश आहे.

प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च,(००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या लेखाशीर्षाखाली ५२- यंत्रसामग्री साधनसामग्री या उद्दीष्टाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ वा वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरहू रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना नियंत्रक प्राधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे, त्यांनी उपरोक्त निधी प्रकल्प संचालक Larsen & Toubro Ltd.-SW&C BU या कंपनीच्या १६३, अन्नासलाई, चेन्नई-६०० ००२ येथील सीटी बँकेच्या शाखेचे खाते क्र.०५२१४६६३०८ (IFSC Code - CITI००००००३) (MICR CODE OF THE BANK-६०००३७००२) या खात्यावर जमा करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका,१९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम,१९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र.२७ अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाने मुंबई सिटी सर्व्हेलन्स प्रोजेक्ट अंतर्गत प्रलंबित कामे व त्रुटींची पूर्तता करण्याचे अधिन राहून बील पारीत होण्याबाबत तसेच प्रस्तुत प्रकल्पाचे कामासाठीच्या विहीत अटी व शर्तीची पूर्तता झाल्याची खात्री करण्याच्या अटीच्या अधिन राहून संबंधित लेखाशीर्षाखाली एकूण अर्थसंकल्पित अनुदानाच्या व लेखानुदानाच्या मर्यादेत वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३७९/२०२४/व्यय-७,दि.२४.६.२०२४ अन्वये सहमती दर्शविली आहे त्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१८१५५८१४२९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2024.07.18 16:09:48 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

मे. एल अँड टी (ईमेल द्वारे)
मे. पी डब्ल्यू सी (ईमेल द्वारे).

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), मंत्रालय, मुंबई.
६) निवड नस्ती, पोल-३.